# अष्टीची अखेरची लढाई

E BOOK 68






मराठ्यांच्या लढायांचा इतिहास

या पुस्तकामध्ये मराठ्यांच्या कित्येक लढायांची वर्णने देण्यात आलेली आहेत. ही वर्णने पूर्वी चित्रमयजगत्‌च्या निरनिराळ्या अंकांतून निरनिराळ्या वेळी प्रसिद्ध झालेली असून हल्ली ती वर्णने एकत्र करून या पुस्तकाच्या रूपाने महाराष्ट्रीय वाचकांच्या पुढे ठेवण्यात येत आहे. या युद्धविषयक वर्णनांच्या लेखमाला प्रथमतः इ. स. १९२५ सालाच्या ऑगस्ट महिन्यापासून सुरुवात करण्यात येऊन ती लेखमाला इ. स. १९२८ च्या मे महिन्यापर्यंत चाललेली होती. ही लेखमाला चित्रमयजगत्‌च्या प्रत्येक महिन्याच्या अंकामध्ये नियमितपणे प्रसिद्ध होत असे, असे नाही. अनेक कारणांमुळे मध्यंतरी कित्येक वेळा प्रत्येक महिन्याला ही वर्णनं छापण्याकरिता देणे शक्य झालेले नव्हते. तेव्हा अशा प्रकारचे हे काही अपरिहार्य अपवाद सोडून बोलावयाचे झाल्यास ही लेखमाला चित्रमयजगत्‌मध्ये सुमारे तीन वर्षेपर्यंत चालू होती. असे म्हणण्यास हरकत नाही. या लेखमालेत ज्या लढायांची वर्णने देण्यात आलेली आहेत, त्या लढायांच्या दृष्टीने या लेखमालेचे एकंदर अदमासे पंधरा भाग कल्पिलेले आहेत. त्यापैकी चौदा भागांत चौदा स्वतंत्र आणि मोठमोठ्या अशा लढायांची वर्णने असून "महाराष्ट्रातील किल्ले" या मथळ्याच्या एकाच भागामध्ये कुलाबा, सातारा, बेळगाव, सोलापूर, नाशिक, खानदेश वगैरे जिल्ह्यांतील निरनिराळ्या किल्ल्यांवर ज्या लढाया झाल्या, त्यांचा समावेश करण्यात आलेला आहे.

वरदा बुक्स
397/1 ... पुणे-16
020-25655654 मोबा. 8975530309 / 9423502920
E-mail : varadaprakashan@gmail.com
www.varadabooks.com
किंमत : 450/-

## भाग ७ अष्टी/ अष्टा – मेढापुरची लढाई



# स्व. शि. म. परांजपे

## मराठ्यांच्या लढायांचा इतिहास

## भाग ७ अष्टी - मेढापुरची लढाई

(अष्टी, अष्टा, अष्टे ही गावांची नाव अनेक भागात असल्याने चकवणारी आहेत. स्व. शि. म. परांजपे यांनी ‘गोपाळाची अष्टी’ असे नामोल्लेख केला असला तरी लढाईच्या संदर्भात ते ‘अष्ट्याची’ लढाई म्हणतात. त्या गावाचे नाव जे आज ही अष्टी हेच आहे. इंग्रजांनी अष्टी असे म्हटले आहे. हे अष्टी गाव गोपाळ कृष्णाच्या ऐतिहासिक मंदिरामुळे पंढरपूरच्या उत्तरेला साधारण २५ कि. मी.वर आहे... इतर लेखन स्व. शि म. परांजपे यांच्या शैलीचा आदर राखून जसेच्या तसे देण्याचा प्रयत्न केला आहे कंस माझे)

‘१ जानेवारी १८१८ रोजी कोरेगाव येथे इंग्लिशांच्या सैन्याचा पेशव्यांनी पराभव केल्यानंतर 'श्रीमंतांच्या फौजेपैकी दहा पाच हजार फौज नारो विष्णु आपटे घेऊन वाघोली पावेतो आले. तेव्हा पुण्यामध्ये इंग्रज यांची पळण्याची तयारी झाली' असे बखरकारांनी लिहिले आहे. वाघोली हे गाव पुण्यापासून फक्त दोन-तीन कोसांवरच आहे; आणि कोरेगावास इंग्लिशांवर विजय मिळविलेल्या मराठ्यांच्या फौजेपैकी दहापाच हजार फौज नारोपंत आपटे यांच्या हाताखाली पुण्याच्या रोखाने येत असलेली ऐकून पुण्यातील इंग्रज लोकांची गाळण उडावी आणि त्यांनी पळण्याची तयारी करावी, हे अगदी स्वाभाविक होते. परंतु पेशव्यांच्या काही फौजा जरी लोणीकंद आणि वाघोली येथपर्यंत येऊन पोहोचल्या होत्या, तरी पेशव्यांची मुख्य फौज कोरेगावहून राजेवाडीच्या मुक्कामाकडे गेली व तेथून पेशव्यांनी आपला मोर्चा साताऱ्याकडे वळविला.

याच्यापूर्वी सातारच्या राजांना वासोट्याच्या किल्ल्यात अटकेत ठेवण्यात आलेले होते. पण पुढे त्यांना तेथून आणवून पेशव्यांनी आपल्याबरोबर घेतले होते व त्यांना आपल्या स्वारीत आपल्याबरोबर घेऊन पेशवे कूच करीत असत. साताऱ्याहून श्रीमंतांची स्वारी निघाली, ती कर्नाटकामध्ये शिरली व तेथून त्यांनी अनेक ठिकाणी प्रयाणे केली. या वेळी इंग्लिश सैन्याच्या निरनिराळ्या टोळ्या त्यांचा पाठलाग करीत होत्या; पण त्या सगळ्या पाठलागात इंग्लिशांना कोठेही म्हणण्यासारखे यश आले नाही. पेशव्यांच्या सैन्यापैकी काही सैन्य इंग्रजी लष्करापुढे दोन तीन कोसांवर असे; आणि काही सैन्य त्यांच्या लष्कराच्या पाठीमागे दोनतीन कोसांवर असे. अशा रीतीने पेशव्यांच्या दोन सैन्यांच्या कचाटीमध्ये बहुतेक वेळा इंग्लिशांचे सैन्य सापडलेले असे. त्यामुळे त्यांना फारसे काही करता येत नसे. परंतु अशा रीतीने जरी पेशव्यांचे सैन्य बाजीरावसाहेबंन संरक्षण करीत एका ठिकणाहन दुसऱ्या ठिकाणी कूच करीत असे, तरी त्यांनी अशा या निरर्थक प्रयत्नांमध्ये तरी किती दिवस काढावयाचे ? त्यांना असा या भुरट्या लढायांचा अखेरीस अखेरीस कंटाळा येऊ लागला व एकदा इंग्रजाला कोठे तरी गाठून त्याच्याशी एखादी मोठी लढाई द्यावी, असे पेशव्यांच्या सर्व सरदारांना वाटू लागले.

निपाणीजवळ ही लढाई द्यावी, असे एकदा त्यांनी ठरविले. पण ठरलेल्या वेळी त्या ठिकाणी सगळीकडच्या मराठी सैन्याची जमवाजमव झाली नाही, म्हणून निपाणीचा बेत रहित करण्यात आला. पुढे फेब्रुवारी महिन्यात सोलापूरनजीक कोठे तरी हा लढाईचा बेत जुळवून आणावा. असे ठरविण्यात आले. बापू गोखले यांच्या चरित्रात याबद्दलची हकिकत दिलेली आहे ती अशी की, "शेवटी प्रसंगी सर्व सरदारांचा बेत असा ठरला होता की, सोलापूर येथे इंग्रजांशी मोठी लढाई द्यावी. सरदारांस पळण्याचा फारच कंटाळा आला होता. त्या बेताप्रमाणे पानशांचा तोफखाना सोलापुरी रवाना झाला होता. पटवर्धनमंडळीही सोलापुरास आली होती. बापू गोखल्यांजवळच्या, गोसाव्यांच्या व अरबांच्या पलटणी सर्व तयार होऊन राहिल्या. ही लढाई झाली असती, तर इंग्रजांस कदाचित् तोंड मागे फिरविणे भाग पडले असते. कारण, या वेळी लढाईची सर्व तयारीच मोठी विलक्षण होऊन राहिली होती.


Tadawale s. wagholi
पुणे मिरज - रेल्वे मार्ग
सध्याचा सालपे ते वाठार मार्ग
सालप्याच्या घाटात थोपवूनधरायला बापू गोखले आणि काही सरदारांचे सैन्य लावले गेले.
सध्याचा सालपे ते वाठार मार्ग
पावसाळ्यात निर्माण झालेल्या नाल्यांच्या अंगाने ८०० मीटरपर्यंत वरचढून जायचे २ किंवा ३ मार्ग असावेत
Salpe

इंग्रजांची चौथी डिव्हीजन साताराच्या आसपास थांबलेली होती. त्यावेळी पेशवा देशामध्ये पंढरपूर ते शोलापूरच्या भागात होता; त्या  भागात त्याने व्यापाऱ्यांकडून भरमसाठ पैसे  कर म्हणून आकारून खर्चासाठी पैसे जमवले असे म्हणतात.

ब्रिगेडियर-जनरल स्मिथने त्यानंतर ताज्या सैन्याने त्यांच्यावर जोरदार हल्ला चढवायची तयारी केली. १९  फेब्रुवारीला तोफखाना न घेतलेली हलकी फौज निघाली. सालपे घाट ते रेडनी व नंतर वेळापुरला ते निघाले ( SALPA AND REDNEE TO YELLAPOOR,) कारण तेथे शोलापूरहून पश्चिमेकडे जाण्यासाठी तयारी चालली आहे अशी पेशव्यांच्या हालचालीची माहिती कळली. परंतु शत्रूने अचानक करकंबकडे (दौंडच्या जवळचे कुरकुंभ  नाही)




जायचा बेत केला आहे असे समजले. म्हणून इंग्रजांनी आपल्या मोर्चाची दिशा बदलली. त्यानुसार ब्रिगेडियर-जनरलने त्याच रात्री संबंधित माहिती गृहित धरून हालचाल केली; त्यांनी कोरोली (पटवर्धनांची) येथे भीमा नदी पार केली. (इंग्रजीतील उच्चार व स्पेलिंग असे केले आहे . "SUDDENLY TURNED ON KURKUM, HE LIKEWISE

# CHANGED HIS DIRECTION, PASSED THE BEEMAH AT KARAOLLEE"



पान २४९ मेमोयर्स ....

गोरसल्ला?जवळ, त्यांनी ऐकले की अष्टी येथे मराठे आदल्या संध्याकाळी होते.  कुठेही न थांबता तडक, यांनी मेंढापुरकडे कूच सुरू ठेवले; आणि रातोरात फे. १९ तारखेला प्रवास करत ते सकाळी जवळच्या टेकडीवरून आठ वाजता ब्रिगेडियर-जनरलने शत्रूच्या नगाऱ्यांचाआवाज खालील सखल भागातून ऐकला. इतकी धावाधाव व्यर्थ गेली नाही याचे समाधान  त्याच्या नजरेतून त्यांना लपवता आले नाही. (तथापि, ती जागा त्यांच्या दृष्टिने लढाईस पूर्णपणे अनुकूल नव्हती; आणि संघर्ष टाळणे ही शक्य नव्हते. तिकडे पेशव्यांची देखील त्या ठिकाणी लढ्याची तयारी नव्हती. त्यांनी त्यांचे तंबू जास्त काळ थांबायच्या दृष्टीने ठोकले होते. जनावरे चरावयाला सोडली होती. लादलेले अवजड सामान अस्ताव्यस्त होते. अचानक इंग्रजांचे सैन्य अगदी जवळ आल्याचे हेरांकडून १९च्या रात्री समजल्यावर त्या दिवशी मोर्चाचा प्रस्ताव बापू गोखल्यांनी बाजीरावांसमोर ठेवला होता.

या प्रसंगाची हकिकत कै. शंकर तुकाराम शाळिग्राम यांनी तयार केलेल्या बापू गोखल्यांच्या चरित्रामध्ये दिलेली आहे..."शके १७३९ माघ शु. चतुर्दशी रोजी रात्री सातारच्या राजाची मुले बरोबर घेऊन गोपाळाचे अष्टीवर श्रीमंत बाजीरावसाहेब मुक्कामाला आले होते. बापू गोखले व त्यांची स्त्री यमुनाबाई व सातारचे राजे व त्यांचे विठ्ठलपंत दिवाण हे बाजीरावसाहेबाबरोबर होते; आणि रामचंद्रपंत सुभेदार व काही स्वार मागे होते. पौर्णिमेच्या दिवशी प्रात:काळ होण्याच्या पूर्वी जेवणाचा बेत उरकून श्रीमंतांचा पुढे जाण्याचा विचार होता. पण ब्रिगेडिअर जनरल स्मिथ यांची जी टोळी चाल करून येत असल्याबद्दलची बातमी होती, त्या टोळीतील तोफेच्या आवाजांचा कानोसा दोन कोसांवरून ऐकू आला. तो ऐकून श्रीमंतांजवळ बापू गोखले गेले आणि म्हणाले की, ‘आपण आजपर्यंत पळत आलो, परंतु आता पळू नये असे मनात आहे’. बाजीरावसाहेबांनी गोखल्यांचा तिरस्कार केला, आणि म्हणाले की, ‘लढाईची मसलत तुम्ही दिलीत आणि आता त्यामुळे

आमच्या जेवण्याखाण्यास हरकत पडते'. ते ऐकून बापूंस राग येऊन ते म्हणाले की, "आपली जरी लढाईची संमती नसली, तरी मी लढाई देणार." इतके बोलून बापू आपल्या गोटात येऊन त्यांनी तयारी करण्याचा हुकूम दिला. ...या हकिकतीमध्ये बाजीरावसाहेबांच्या वर्तनावर आक्षेप घेता येईल, असे काही उल्लेख आलेले आहेत. कै. शाळिग्राम यांनी आपल्या ह्या पुस्तकामध्ये बाजीरावसाहेबांच्या बद्दलच्या कित्येक निराधार आक्षेपांचे स्वत:च खंडन केले आहे, ही गोष्ट कोणालाही नाकबूल करता यावयाची नाही. पण बाजीरावसाहेबांच्या संबंधाने इंग्लिश लोकांनी आणि लेखकांनी आणि त्यांना फितुर झालेल्या अशा आपल्याही कित्येक लोकांनी इतके खोटे आक्षेप पसरवून ठेविले आहेत की, त्यामुळे बाजीराव हा आपल्या लोकांनाही एक अतिशय दुष्ट माणूस आहे, असे वाटू लागले होते.

## लढाई कशी झाली?

ता. २० फेब्रुवारी १८१८ रोजी सकाळी प्रहर दिवसाचे सुमारास अष्ट्याच्या लढाईला सुरुवात झाली. ब्रिगेडिअर जनरल स्मिथ ह्याच्या हाताखालील लष्कर शेजारच्या टेकडीवरून अष्ट्याच्या खोऱ्यामध्ये सकाळी प्रहर दिवसाच्या सुमाराला उतरू लागले होते. ते सैन्य अशा रीतीने कूच करून डोंगरावरून खाली उतरत असता बावीसाव्या ड्रगून पलटणीच्या दोन टोळ्या मध्यभागी चालल्या होत्या; त्याच्या उजव्या बाजूला मद्रासची सातवी नेटिव्ह घोडेस्वारांची पलटण आणि डाव्या हाताला दुसरी घोडेस्वारांची नेटिव्ह पलटण चाललेली होती; आणि या सैन्याच्या तीन रांगांच्या बाहेरच्या उजव्या बाजूला कॅप्टन पिअर्स आणि डाव्या बाजूला फ्रिथ यांच्या हाताखाली घोड्यावरील तोफखाना चालविण्यात आलेला होता. सैन्याच्या रांगा अशा क्रमाने कूच करीत जाऊन शत्रू जवळ आला म्हणजे प्रत्यक्ष लढाईला सोईस्कर अशी सैन्याची रचना बदलून मग शत्रूवर हल्ला करावयाचा. असा ब्रिगेडिअर जनरल स्मिथ याचा इरादा होता. ज्या टेकडीवरून अशा रीतीने इंग्लिशांचे सैन्य खाली उतरत होते, त्या

**टेकडीच्या पुढे खाली काही अंतरावर एक लहानशी नदी होती, व त्या नदीच्या पलिकडच्या काठावर पेशव्यांच्या सैन्याची छावणी होती.**



ही छावणी जवळ येऊ लागली, त्या वेळी इंग्लिश सैन्यातील घोडेस्वारांची पलटणे कूच करण्याच्या वेळच्या आपल्या रांगा बदलून शत्रूला तोंड देण्याकरिता एका लांब रांगेमध्ये उभे राहाण्याच्या तयारीला लागली. पण या त्यांच्या रांगा तयार झाल्या नाहीत, आणि इंग्लिशांच्या घोडेस्वारांना लढाईच्या शिस्तीने उभे राहाण्याला फुरसत सुध्दा सापडू शकली नाही...

बापू गोखले यांनी श्रीमंतांचा निरोप घेतला; त्यांची सुरक्षितपणे रवानगी करून देण्याची तजवीज केली आणि आपण आपल्या हाताखालील लोकांनिशी ते शत्रूवर हल्ला करण्याकरिता तडक निघाले. पेशव्यांची छावणी आणि शत्रूचे सैन्य यांच्या दरम्यान एक लहानशी जी (?) नदी होती, ती ओलांडून बापू गोखल्यांचे स्वार एकदम आणि अचानक रीतीने इंग्रजी सैन्याच्या सातव्या पलटणीची जी रांग बनविण्यात येत होती, तिच्यावर चाल करून आले. इतक्यात बापू गोखले यांचा हल्ला इंग्लिशांच्या लाइनीवर येऊन पडला ! बापू गोखल्यांचा हा एकदम छापा आल्यामुळे त्या सातव्या घोडेस्वारांच्या पलटणीमध्ये फारच घोटाळा उडून गेला. बापू गोखल्यांचे स्वार शत्रूच्या लोकांवर आपल्या बंदुकी झाडीत तसेच पुढे चालले. बावीसावी ड्रगून्सची पलटण मध्यभागी आणि सातवी मद्रासची नेटिव्ह घोडेस्वारांची पलटण उजव्या बाजूला, अशा रीतीने मागून कूच करीत येताना या पलटणी चालल्या होत्या, हे पूर्वी सांगितले आहे. या दोन तुकड्यातील लोक सोबतच्या नकाशात दाखविलेल्या ठिकाणी आपली रांग बनवून उभे राहाण्याच्या उद्योगात होते. आणि या रांगेमध्ये मद्रासची सातवी पलटण उजव्या बाजूला आणि बावीसावी ड्रगून्सची पलटण डाव्या बाजूला अशा रीतीने या पलटणी आपल्या रांगा बनविण्यात गुंतलेल्या होत्या. अशा संधीत बापु गोखल्यांचे घोडेस्वार या ब्रिटिश लाइनीच्या समोर येऊन उभे राहिले; आणि त्या लाइनीच्या उजव्या बाजूला जी सातवी घोडेस्वारांची जी पलटण होती, तिला वळसा घालून बापू गोखले यांचे काही स्वार सदर लाइनीच्या डाव्या बाजूकडील बावीसाव्या ड्रगून पलटणीच्या पिछाडीवरही हल्ला करण्याकरिता पुढे सरसावले. अशा

**रीतीने पेशव्यांच्या सैन्याने शत्रूच्या बावीसाव्या ड्रगून पलटणीला आणि सातव्या मद्रासच्या पलटणीला चोहोकडून व्यापून टाकले.**

**त्यावेळी शत्रूचे सैन्य बापू गोखले यांनी आपल्या घोडेस्वारांच्या वर्तुळाकार कोटामध्ये चोहो बाजूनी कसे वेष्ट्रन आणि कोंडून टाकले होते, हे सोबतच्या लढाईच्या नकाशावरून कोणाच्याही लक्षात येण्यासारखे आहे. बापू गोखले यांचे जे कौशल्य होते, ते यातच होते. तेथील ब्रिटिश लष्कराच्या रांगेतील उजव्याला खुद्द ब्रिगेडिअर जनरल स्मिथ हा होता. आणि डाव्या बाजूला मेजर डॉवेस हा होता. असे असतानाही बापू गोखले हे आपल्या हाताखालील थोड्याश्या घोडेस्वारांच्या मदतीने या सगळ्या इंग्रजी मेजरांना आणि ब्रिगेडिअर जनरलांना चोहोकडून हां-हां म्हणता गराडा घालू शकले आणि इंग्रजी फौजेच्या पुढून आणि मागून अशा दोन्हीही बाजूंनी बापू गोखल्यांनी शत्रूच्या सैन्यावर एकाच वेळी हल्ला करण्याला सुरुवात केली, ही लष्करी कौशल्याच्या दृष्टीने अत्यंत वाखाणण्यासारखी गोष्ट आहे. या लढाईत बापू गोखले यांनी दोन गोष्टींमध्ये आपले युध्दकौशल्य प्रदर्शित केले. त्यापैकी पहिली गोष्ट ही की, आपल्या सैन्याच्या रांगा व्यवस्थितपणे बनवू देण्याला त्यांनी शत्रूला अवकाश मिळू दिला नाही. आणि शत्रू अशा बिनतयारीच्या स्थितीमध्ये गोंधळून गेलेला असताना बापू गोखले यांनी शत्रूच्या सैन्याला चौफेर रोखून आणि वेढून टाकले, ही दुसरी गोष्ट होय.**



११ सातारच्या गादीचे वारसांना इंग्रजांनी ताब्यात

५ बापू गोखलेंचे वळसा घातून आलेले

१घोड्यावरील तोफखानापेशव्यां ची छावणी बापू

Camp of the British Cavalry after the Action

९ रागरंग पाहून बाजीराव पैसा व सरंजाम घेऊन सटकले. ते पाहून अनेक सरदारांनी त्यांची साथ सोडली.

१ मेंढापुरच्या टेकड्यावरून पेशव्यांचा सैन्य तळ दिसला

२ उजवीकडे मद्रासची सातवी नेटिव्ह घोडेस्वारांची पलटण
२ डावीकडे नेटिव्ह घोड्यावरील तोफखाना पलटण
२ मधली फळी ड्रगून पलटणी

८ मुख्य लढ्यात दोन बाजूंनी घेरल्यानंतर बापूंना गोळी लागल्यानंतर भांबाऊन मराठे सैरभैर झाले...

# अष्ट्याच्या लढाईंतील सैन्यांच्या हालचालींचें वर्णन.

१ १ १ पेशव्यांच्या छावणींतील घोडेस्वारांची पल्टण.

२ २ २ डोंगरावरून अष्ट्याच्या खोऱ्यामध्यें ब्रिटिश घोडेस्वार तीन रांगा करून खालीं उतरत आहेत.

३ ३ इंग्लिशांच्याकडील तोफा.

४ ४ ४ ४ बापू गोखले यांचे घोडेस्वार शत्रूवर हल्ला करण्याकरितां येत आहेत, तो मार्ग.

५ ६ बापू गोखले यांचे घोडेस्वार आपल्यावर हल्ला करण्याकरितां चढाई करून येत आहेत, असें पाहिल्यानंतर उजव्या बाजूला सातवी पल्टण आणि डाव्या बाजूला बाविसाव्या ड्रगून्सची पल्टण, अशा या दोन पल्टणी ज्या रांगेमध्यें घाईघाईनें लढाई देण्याकरितां उभ्या राहिल्या, ती रांग.

७ दुसरी नेटिव्ह घोडेस्वारांची पल्टण डाव्या बाजूला उभी राहिली होती ती जागा.

८ ८ ८ इंग्रजी घोडेस्वारांच्या पल्टणीच्या रांगेला वेढून टाकण्याकरितां पुढून, बाजूनें आणि पिछाडीकडून बापू गोखल्यांच्या घोडेस्वारांनीं इंग्लिश सैन्याभोंवती वळसा घालून जो गराडा दिला तो.

९ ९ ९ पेशव्यांचें सैन्य बापू गोखल्यांच्या मरणानंतर ज्या मार्गानें माघारें निघून गेलें, तो मार्ग.

१० १० १० घोडेस्वारांच्या दुसऱ्या पल्टणीनें केलेला पेशव्यांच्या सैन्याचा पाठलाग.

११ ज्या ठिकाणीं सातारचे महाराज इंग्लिशांच्या स्वाधीन झाले, ती जागा.

१२ लढाईनंतर इंग्लिश घोडेस्वार जेथें छावणी करुन राहिले ती जागा.

———

( पान ४८ च्या पुढें. )

लढाईमध्ये अखेरीस जय मिळणे किंवा पराजय होणे, ह्या गोष्टी दैवाधीन असतात. परंतु सेनापती आपले सैन्य शत्रूवर हल्ला करण्याकरिता केव्हा नेतो, कसे नेतो, आणि त्या सैन्याच्या मदतीने तो काय कर्तबगारी करतो, यावरच त्या सेनापतीचे गुणावगुण अवलंबून असतात. नेपोलियन हा एवढा मोठा योध्दा, पण त्याचाही वॉटरलूच्या लढाईमध्ये पराभव झाला. परंतु त्यामुळे शूर योध्दा आणि कुशल सेनापती या दृष्टीने त्याने जी अजरामर कीर्ती कमावून ठेविलेली आहे, तिच्यामध्ये यकिंचितही कमतरपणा आलेला नाही; आणि बाप गोखले याचीही तशीच गोष्ट आहे. बाजीरावसाहेबांवर अचानक छापा

घालण्याकरिता वेळापूरहून इग्लिशांचे सैन्य ताबडतोबीने कूच करून अष्ट्याला आले होते अशा वेळी बाजीरावसाहेबांची आधीच पुढे दुसरीकडे रवानगी करून देऊन बापू गोखल्यांनी आपल्या धन्याच्या जिवाला धक्का लागू न देता त्यांच्यावरील छाप्याचा प्रसंग अजिबात टाळला; आणि जे इंग्लिश लोक बाजीरावांवर छापा घालण्याकरिता आलेले होते, त्यांनाच उलट बेसावध स्थितीत गाठून, गोखल्यांनी दिवसाढवळ्या त्यांच्यावरच छापा घातला; आणि त्यांनाही कोंडून टाकले. हा पराक्रम त्यांनी ज्या अष्ट्याच्या रणांगणावर करून दाखविला त्या रणांगणावर दैवाच्या दुर्निवारतेमुळे जरी ते मरण पावले असले तरी कीर्ती त्या ठिकाणी आणि महाराष्ट्रीयांच्या सर्व अंत:करणामध्ये अद्यापिही आहे ! बापू गोखले यांचा देह अष्ट्यास पतन पावला; पण त्यांच्या की ध्वजा त्या ठिकाणी कायमची उभारण्यात आलेली आहे ! आणि महाराही लोकांच्या अंत:करणामध्ये जोपर्यंत आपल्या मागील इतिहासाची स्मृति जागत आहे, तोपर्यंत ती ध्वजा त्या ठिकाणी नेहमी फडकत राहील ! आपले राज्य गेल्यामुळे त्याच्याबरोबर आपल्यातील मोठ्या लोकांची किंमतही गेलेली आहे। बापू गोखले ! तुम्ही एखाद्या स्वतंत्र देशात जन्मास येऊन असे पराक्रम केले असते, तर तुमची किती थोरवी गाण्यात आली असती ! तुमच्याकरिता किती रणस्तंभ उभारण्यात आले असते ! त्या रणस्तंभावर किती लोकांनी येऊन तुमच्या पराक्रमाच्या स्मरणासाठी पुष्पहार अर्पण केले, भावी पिढीतील किती तरुणांनी तुमच्या त्या रणस्तंभाकडे पाहून मी या बापू गोखल्यांसारखा आपल्या देशाची सेवा करणारा सेनापती होईन' असे आपल्या मनाचे दृढनिश्चय केले असते ! आणि 'या बापू गोखल्यांच्या सारखा शूर आणि स्वामिनिष्ठ पुत्र माझ्या पोटी जन्मास यावा' अशी तुमच्या त्या रणस्तंभाकडे पाहून किती आयांनी आपल्या मनामध्ये प्रार्थना केल्या असत्या ! पण बापू गोखले ! हल्ली तुमची स्थिती काय आहे ! तुम्ही या हतभाग्य हिंदुस्थान देशात कशाला जन्माला आला? तुमचे नाव आदरयुक्त भावनेने असे किती लोकांना माहीत आहे ? पुण्यातील तुम्ही एवढे मोठे शूर आणि स्वामिनिष्ठ सरदार ! पण पुण्यात पेशव्यांच्या राज्याबद्दल ज्यांनी फारशी कधी काळजी घेतली नाही, त्यांचे राजवाडे, त्याची इनामे आणि त्यांच्या

**जहागिरी मोठ्या ऐषआरामामध्ये नांदत असताना पुण्यात तुमचे काय उरले आहे ? पुण्यात तुमचा वाडा नाही, पुण्यात तुमचे इनाम नाही, किंवा पुण्यात तुम्हाला कोठे जहागीर नाही ! असा देवाच्या घरचा उलटा न्याय...**

**... याचे चित्र कसे बदलले त्याचे वर्णन करताना कै. शि. म. परांजपे म्हणतात, '...मि. एल्फिन्स्टन हे पुण्याचे रेसिडेंन्ट झाल्याबरोबर पुण्यातील सगळे गाडे बदलले. बाजीराव इतके दिवसपर्यंत जो एक साधारणपणे चांगला राजा होता, तो अतिशय बदमाष म्हणून पुण्यातील लोकांना दिसू लागला !**



***मॅकियावेली: युरोपचा 'चाणक्य', कोण म्हणाला - राज्यकर्त्यांनी 'कुटिल' असणे चांगले!***

*राजाने प्रजेचा शत्रू बनू नये असे मॅकियावेलीचे मत आहे, परंतु प्रजेच्या मैत्रीमुळे राज्यात आनंद पसरला पाहिजे असे नाही असेही तो म्हणतो. तो म्हणतो की त्याच्या दयाळूपणाचा वापर त्याच्या आणि त्याच्या राज्याविरूद्ध केला जाऊ शकतो. राजाची मैत्री हे फक्त एक राजकीय शस्त्र आहे ज्याचा वापर करून राजा आपल्या राज्यात स्थैर्य आणतो आणि आपल्या राज्याचा विस्तार करतो.*

**युरोपातील मॅकिओव्हेलीचे कुटिल राजनीतीचे मार्ग मि. एल्फिन्स्टन यांनी पुण्यात फार जारीने सुरू केले. इंग्रजी पैसा जिकडेतिकडे पेरण्यात आला; चाहड्या सांगणारे हरामखोर लोक स्वामिनिष्ठ लोकांमधूनही आढळून येऊ लागले; पेशव्यांकडच्या गुप्त बातम्या बेटावरच्या बंगल्यात कळू लागल्या; आणि बाजीरावाच्या दुर्गणांच्या राईचे पर्वत होऊ लागले' ! पुढे वाचा ...भाग ८**